राज्य मानवी हक्क आयोगाचे कार्यालय,
लेखा व प्रशासन उपविभागामध्ये पदे
निर्माण करणे.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग।

शासन निर्णय क्रमांक एचआरसी १३२०००/संकीर्ण ३५/ पोल १४
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२, दिनाक:- १३ सप्टेंबर,२००१.

<u>वाचा</u>:- शासन निर्णय गृह विभाग एचआरसी १०९९/३७८/ पोल १४,दि.१५ जानेवारी ,२०००

<u>शासन निर्णय :-</u> मानवी हक्क संरक्षण अधिनियम ,१९९३ मधील कलम २१ नुसार राज्यात राज्य मानवी हक्क आयोग निर्माण करण्यात आला आहे.या आयोगासाठी सध्या कमीत कमी अशी पदे निर्माण करण्यात आली आहेत.आयोगाचे संशोधन ,लेखा,प्रशासन उप विभागामध्ये पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता . त्यास आता शासनाने मान्यता दिली असुन त्यानुसार शासन आता राज्य मानवी हक्क आयोगाच्या संशोधन,लेखा व प्रशासन उप विभागामध्ये पुढील प्रमाणे पदे निर्माण करण्यास शासन मंजुरी देत आहे.ही पदे प्रथमत: दि.२८.२.२००२ पर्यंत मजूर करण्यात येत आहेत.

| पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी. |
|---|---|---|
| <u>अ) संशोधन उप विभाग</u> | | |
| १)संशोधन अधिकारी | १ | रु.६५००-२००-१०५०० |
| २)विधी सहायक | १ | रु.५५००-१७५-९००० |
| ३)लिपिक | १ | रु.३०५०-७५-३९५०-८०-४५०० , |
| <u>ब) लेखा उप विभाग</u> | | |
| १) अकाऊटंन्ट | १ | रु.५५००-१७५-९०००+ २००रु. विशेष भत्ता |
| २) बिल लिपिक | १ | रु.३०५०-७५-३९५०-८०-४५०० |

**क) प्रशासन उप विभाग**

| | | |
|---|---|---|
| १) कक्ष अधिकारी | १ | रु.६५००-२००-१०५००/- |
| २) सहायक | १ | रु.५५००-१७५-९००० |
| ३)लिपिक | २ | रु.३०५०-७५-३९५०-८०-४५०० |

२. वरील पदे अतिरिक्त संवर्ग कक्षामध्ये अतिरिक्त ठरलेल्या कर्मचा-यांमधुन भरण्यात यावीत.

३. वरील पदे निर्मितीसाठी रु. २,९४,००० /- आवर्ती व फर्निचरसाठी रु.६०,०००/- अनावर्ती असा एकूण रु. ३,५४,०००/- इतका खर्च येणार आहे. हा खर्च २०५२- सचिवालय - सामान्य सेवा -०९०- सचिवालय - ( एक ) (पाच) - राज्य मानवी हक्क आयोग (२०५२-०५१७ ) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो वित्त विभाग क्रमांक आकनि -११०१/३२/अर्थसंकल्प–१०[ ८०००–०३२–८/२०] दिनांक १३. ९. २००१ अन्वये आकस्मितता निधीतून मंजूर करण्यात आलेल्या रु.३,५४,०००/- ( रुपये तीन लाख चोपन हजार फक्त ) च्या अग्रीमातून करण्यात यावा. या अग्रिमाची परिपुर्ती करण्यासाठी आगामी अधिवेशनात पुरक मागणी सादर करण्यात येईल.

४. नियंत्रण अधिका-यांना असेही कळविण्यात येते की, त्यांनी आकस्मितता निधीतून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिका-यांकडे रक्कम सुपूर्द करण्यासबंधीच्या आदेशात/ पत्रात आगाऊ रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकावर " आकस्मिता निधी " अग्रिम शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक आकनि ११०१/३२/ अर्थसंकल्प–१०[ ८०००–०३२– ८ / २० ] दि. ३. ९. २००१ अन्वये मंजूर असे **लाल शाईने** अधोरेखीत करावे.तसेच आकास्मिकता निधीतून काढलेल्या अग्रिमातून करावयाच्या खर्चाबाबत महाराष्ट्र अर्थसकल्पीय नियम पुस्तिकेतील प्रकरण १६ मध्ये विशद केलेल्या नियमाची व शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.सीएनएफ १०८६/१५३ अर्थसकल्पीय -३,दिनांक २८.८.१९९६ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांचेही काटेकोरपणे पालन करण्यात यावे.तसेच अग्रीमातून प्रत्यक्ष केलेल्या खर्चाची एकंत्रित माहिती त्यांनी त्या महिन्यानतर १५ तारखेपर्यन्त वित्त विभागास (अर्थसंकल्प ३ ) मंत्रालय,मुंबई यांना पाठवावी व त्याची एक प्रत गृह-विभाग यांजकडे पाठविण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर ८५७/२००१/ व्यय ७,दि.७.९.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. ना. भोसले )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

विशेष कार्य अधिकारी ,राज्य मानवी हक्क आयोग,महाराष्ट्र राज्य,मुंबई
महालेखापाल ,महाराष्ट्र १/२ ( लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परिक्षा ),
मुंबई/ नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
वित्त विभाग (व्यय ७ )( वित्तीय सुधारणा )
गृह विभाग ( बीयुडी १ )(आस्था२)
संचालक ,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष ,५ वा मजला ,नवी प्रशासन भवन,मंत्रालयासमोर , मुंबई ३२.
निवड नस्ती.